महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब (कनिष्ठ) मधील
पदावरील सेवा समाप्त करणेबाबत.
श्री. सयाजी जालिंदर फडतरे

महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन आदेश क्रमांकः कृषिआ-३४२२/प्र.क्र.७३/१६अे
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: २९ एप्रिल, २०२२

वाचा-

१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र.आकृवि-०७१६/प्र.क्र.२४९/१५-अे, दि.०९ जानेवारी, २०१८
२) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/कृअ१११(ब)/अनुपस्थित/फडतरे/प्र.क्र.७२७/ आस्था-४/१६८२, दि.१७ जानेवारी, २०२२

प्रस्तावना:-

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने डिसेंबर, २०१३ मध्ये श्री.सयाजी जालिंदर फडतरे यांची खेळाडू या आरक्षणातून महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब (कनिष्ठ) संवर्गात नियुक्तीकरिता शिफारस केलेली होती. श्री.फडतरे यांच्या क्रीडाविषयक प्रमाणपत्र पडताळणी आणि शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या अभिप्रायांनंतर त्यांना उपरोक्त दि.०९ जानेवारी, २०१८ रोजीच्या आदेशान्वये महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम क्रमांक ९ (४२) मध्ये विहित केलेल्या परिवीक्षाधीन या संज्ञेच्या व्याख्येनुसार तात्पुरती नियुक्ती देण्यात आलेली आहे. सदर आदेशानुसार श्री.फडतरे हे दि.०९.०२.२०१८ रोजी कृषि अधिकारी, विभागीय कृषि सहसंचालक, औरंगाबाद या पदावर हजर झाले.

२. विभागीय कृषि सहसंचालक, औरंगाबाद यांनी श्री.फडतरे यांना दि.१४.०३.२०१८ रोजी जल जीवन कार्यशाळा, पुणे येथे उपस्थित राहण्यास सूचित केल्यानुसार ते सदर कार्यशाळेस उपस्थित होते. तद्नंतर दि.१५.०३.२०१८ रोजी विभागीय कृषि सहसंचालक, औरंगाबाद कार्यालयात त्यांनी उपस्थित राहणे आवश्यक होते. तथापि, दि.१५.०३.२०१८ पासून कोणतीही पूर्वसूचना न देता किंवा रजेचा अर्ज न सादर करता श्री.फडतरे हे कार्यलयात अनधिकृत गैरहजर राहिले.

३. श्री.फडतरे यांच्या अनधिकृत गैरहजेरीबाबत विभागीय कृषि सहसंचालक, औरंगाबाद यांनी दि.१६.०४.२०१८, २६.०४.२०१८ रोजी कारणे दाखवा नोटीस देऊन खुलासा सादर करण्यास सूचित केले. सदर नोटीशींचा खुलासा श्री.फडतरे यांनी दि.०३.०५.२०१८ रोजी टपालामार्फत सादर करुन आईच्या आणि सासऱ्यांच्या आजारपणाच्या कारणास्तव दि.१५.०३.२०१८ रोजीपासून गैरहजर असल्याचे कळविले आहे. तथापि, त्यांनी खुलाशासोबत कोणतेही वैद्यकीय प्रमाणपत्र सादर केले नाही व ते कामावर उपस्थित सुध्दा झाले नाहीत.

४. तद्नंतर विभागीय कृषि सहसंचालक, औरंगाबाद यांचेकडून श्री.फडतरे यांना दि.३१.१०.२०१९, २७.०१.२०२० आणि दि.२०.०८.२०२० रोजी पुनश्च: कारणे दाखवा नोटीस देण्यात आली. सदर नोटीशीनुसार त्यांचेविरुध्द कडक शिस्तभंगाची कारवाई प्रस्तावित करुन सेवा समाप्त करण्याबाबत त्यांना जाणीव करुन देण्यात आली. तरीसुध्दा श्री.फडतरे यांनी सदर नोटीशींचे उत्तरही दिले नाही तसेच ते कर्तव्यावर उपस्थित सुध्दा झाले नाहीत.

५. विभागीय कृषि सहसंचालक, औरंगाबाद यांनी श्री.फडतरे यांच्या अनधिकृत गैरहजेरीबाबत आयुक्त (कृषि) कार्यालयास कळविल्यानंतर कृषि आयुक्तालय स्तरावरुन श्री.फडतरे यांना दि.११.१२.२०२० रोजी कारणे दाखवा नोटीस बजावण्यात आली. सदर नोटीशीचा खुलासासुध्दा त्यांनी सादर केला नाही.

६. श्री.फडतरे यांच्या नियुक्ती आदेशातील अट क्र.५ नुसार परिवीक्षाधीन अधिकाऱ्याने कामाचा अपेक्षित दर्जा प्राप्त न केल्यास किंवा विभागीय लेखा परीक्षा विहित कालावधीत उत्तीर्ण न केल्यास अथवा त्यांची वर्तणूक अयोग्य, संशयास्पद आढळल्यास तो कोणतीही पूर्वसूचना न देता सेवेतून कमी करण्यास पात्र ठरेल.

७. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.२२.०६.२०२१ मधील मुद्दा क्र.१० (४) नुसार परिवीक्षा कालावधीत विनापरवानगी गैरहजर राहिल्यास अशा उमेदवारास तात्काळ ज्ञापन देऊन खुलासा मागविण्यात यावा आणि विहित मुदतीत खुलासा प्राप्त न झाल्यास त्याची शासकीय सेवा समाप्त करण्याचे आदेश निर्गमित करावेत, अशी तरतूद आहे.

८. श्री.फडतरे यांनी दि.१५.०३.२०१८ पासून दीर्घकाळ अनधिकृत गैरहजर राहून कार्यालयीन शिस्तीचा भंग केला आहे. तसेच त्यांनी विभागीय कृषि सहसंचालक, औरंगाबाद आणि आयुक्त (कृषि) यांचेद्वारा देण्यात आलेल्या कारणे दाखवा नोटीसचा खुलासा सादर केलेला नाही. त्यानुसार त्यांना शासकीय नोकरीची आवश्यकता नसल्याचे स्पष्ट होत असल्याने दि.०९.०१.२०१८ रोजीच्या नियुक्ती आदेशातील अट क्र.५ तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.२२.०६.२०२१ मधील मुद्दा क्र.१० (४) नुसार श्री.फडतरे यांच्या सेवा समाप्त करण्याचा प्रस्ताव कृषि आयुक्तालयाने शासनास सादर केला आहे. त्यानुसार शासन आता, खालीलप्रमाणे आदेश पारित करीत आहे.

**<u>शासन आदेश:-</u>**

परिविक्षा कालावधीत दि.१५.०३.२०१८ पासून आजतागायत विनापरवानगी अनधिकृतरित्या गैरहजर राहिल्याच्या कारणास्तव श्री.सयाजी जालिंदर फडतरे, कृषि अधिकारी, विभागीय कृषि सहसंचालक, औरंगाबाद यांच्या सेवा दि.०९.०१.२०१८ रोजीच्या नियुक्ती आदेशातील अट क्र.५ तसेच सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.२२.०६.२०२१ मधील मुद्दा क्र.१० (४) नुसार समाप्त करण्यात येत आहे. श्री.फडतरे यांना यापुढे त्यांच्या महाराष्ट्र कृषि सेवा गट-ब (कनिष्ठ) पदावरील सेवेचा कोणताही हक्क राहणार नाही तसेच त्यांनी यापुढे नियुक्तीसंदर्भात केलेल्या कोणत्याही दाव्याची दखल घेतली जाणार नाही.

२. आयुक्त (कृषि) यांनी सदर आदेशाची तात्काळ अंमलबजावणी करुन शासनास अहवाल सादर करावा.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४२९१२५१२८४००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

JYOTSNA SUNIL ARJUN

Digitally signed by JYOTSNA SUNIL ARJUN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=48807fd571bd08b7318f82f32c3ac18b4a938a342e23932200c3df8b0bdd4563, pseudonym=B6E9ECA936BF2C03EE8B083F338E65F7AF36F6CD, serialNumber=984B9ADBA8339F7D6208C334DDD686A8F076E25FFF19427CAAC5BD0E7F88E592, cn=JYOTSNA SUNIL ARJUN
Date: 2022.04.29 12:53:18 +05'30'

**( ज्योत्स्ना अर्जुन )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:- माहितीस्तव.**

१) मा.मंत्री (कृषि) / मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, कुपरेज टेलिफोन भवन, मुंबई
३) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) विभागीय कृषि सहसंचालक, औरंगाबाद
५) प्रधान सचिव ( कृषि ) यांचे स्विय सहायक, कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई
६) श्री.सयाजी जालिंदर फडतरे, कृषि अधिकारी (द्वारा- कृषि आयुक्तालय, पुणे)
७) निवड नस्ती /१६अे.